पोलीस अधीक्षक, अमरावती (ग्रा) यांचे
आस्थापनेवरील भातकुली पोलीस ठाणे पोलीस
आयुक्त, अमरावती शहर यांचे आस्थापनेवर वर्ग
करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक टीटीसी २२०९/१९२/प्र क्र ९६/पोल-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक १४ जून २०११

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांक अेपीओ ३१०८/६९७/प्र क्र २८४/पोल-३ दिनांक ०७/०८/२०११

२) पोलीस महासंचालक, यांचे पत्र क्रमांक पोमसं २६अ/४७/अमरावती ग्रामीण(भातकुली) १/८९/ दिनांक १२.०५.२०१० व दिनांक ०३.०२.२०११

३) पोलीस आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्रमांक पोआअ/पशा/प्रलि/पो.स्टे.भातकुली/ २१३२/२०११ दिनांक ८ एप्रिल, २०११

४) पोलीस अधीक्षक, अमरावती यांचे पत्र क्र पशा-२/वर्ग/भातकुली /११४/२०११/१२९४ दिनांक २४ मार्च. २०११

शासन निर्णय :-

शासन निर्णय दिनांक ०७ ऑगस्ट, २००८ अन्वये पोलीस अधीक्षक, अमरावती ग्रामीण यांचे आस्थापनेवर भातकुली पोलीस ठाणे निर्माण करण्यात आले आहे. भातकुली पोलीस स्टेशन अंतर्गत येणा-या सर्व गावाकरिता महसूल / पोलीस व इतर सर्व प्रशासकीय कार्यालय अमरावती शहरात असल्याने तेथील नागरिकांच्या सोईच्या दृष्टीने भातकुली पोलीस ठाणे पोलीस अधीक्षक, अमरावती ग्रामीण यांचे आस्थापनेवरुन मनुष्यबळ व साधनसामुग्रीसह पोलीस आयुक्तलाय, अमरावती यांचे आस्थापनेवर वर्ग करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय विभागस्तरावर मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०६०९१५४५३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

(प्र. मो. वानखडे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) विशेष पोलीस महानिरिक्षक, अमरावती परिक्षेत्र, अमरावती
३) पोलीस आयुक्त, अमरावती
४) पोलीस अधीक्षक, अमरावती
५) महालेखापाल (लेखापरीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई